राज्यातील सीसीटीएनएस प्रकल्पासंदर्भात विविध कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीसीटीएनएस-३६१५/प्र.क्र.२०२/ पोल-३,**
मंत्रालय , २ रा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २७ मार्च,२०१७.

वाचा:- १) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक:- एमआयएस ०५०८/७४८/प्र. क्र.३२९/पोल-४, दि.२२.५.२००९.
२) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अध्यक्षतेखालील SEC (State Empowered Committee) समितीच्या दि. ४.७.२०१६ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त,
३) अपर मुख्य सचिव (गृह )यांच्या अध्यक्षतेखालील दि.१२.७.२०१६ व दि. २८.१२.२०१६ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्य ॲपेक्स समितीच्या दि. १७.१.२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या ई-गव्हर्नन्स योजनेअंतर्गत राज्यात सीसीटीएनएस प्रकल्प राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पातर्गत राज्यातील १०५४ पोलीस ठाणी व ६२९ वरिष्ठ पोलीस कार्यालये CAS (Core Application Software ) सॉफ्टवेअरव्दारे जोडण्यात आली आहेत. सदर प्रकल्पाचे दि.१५.९.२०१५ रोजी सन्माननीय राज्यपाल महोदयांच्या हस्ते लोकार्पण पार पडले आहे. सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत जोडण्यात आलेल्या १०५४ पोलीस ठाणी व ६२९ वरीष्ठ कार्यालयामध्ये २ mbps नेटवर्क कनेक्टिव्हीटी उपलब्ध करुन देण्यास व त्यासाठी येणा-या रु. ८,६८,७२,२५५/-( वार्षिक आवर्ती खर्च) एवढ्या आवर्ती खर्चास व सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत स्टेट डाटा सेंटर (बीएसएनएल आयडीसी मुंबई) व डिझास्टर रिकव्हरी सेंटर (एनआयसी,नवी दिल्ली)या ठिकाणी Multiprotocol Label Switching (MPLS) नेटवर्क कनेक्टीव्हीटीचे ३४ Mbps ते १ Gbps कनेक्टीव्हीटी मध्ये सन २०१६-२०१७ पासुन पुढील काळासाठी अपग्रेडेशन करण्यासाठी व त्यासाठी येणा-या रु. १,५७,८१,२१०/- एवढ्या वार्षिक आवर्ती खर्चास मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षततेखालील राज्य ॲपेक्स समितीच्या (SAC) दि.१७.१.२०१७ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. त्याचबरोबर सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत Pentaho Business Intelligence/ Crime Analytics Tool हे सॉफ्टवेअर जोडणी करण्यास व त्यासाठी येणा-या रु. ३५ लाख एवढ्या अनावर्ती खर्चास व विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष

यांच्या कार्यालयात सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत दोन नोडची जोडणी करण्यासाठीच्या रु.६,६६,०३७/- एवढ्या अनावर्ती खर्चास राज्य ॲपेक्स समितीच्या सदर बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर सर्व प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :

सीसीटीएनएस प्रकल्पासंदर्भात विविध कामासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्य ॲपेक्स समितीने दिलेल्या मान्यतेनुसार खालील तक्त्यात नमुद केलेल्या कामासाठी/ बाबींसाठी व त्यासाठी येणा-या आवर्ती/ अनावर्ती खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रस्तावकामे/ | राज्य ॲपेक्स समितीची मान्यता | आवर्ती/अनावर्ती खर्चाची रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत जोडण्यात आलेल्या १०५४ पोलीस ठाणी व ६२९ वरीष्ठ कार्यालये यासाठी बी. एस. एन. एल. कंपनीमार्फत २ mbps नेटवर्क कनेक्टीव्हीटी देणे.<br>(सन २०१७-२०१८) | मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दि.१७.१.२०१७ रोजीच्या राज्य ॲपेक्स समितीच्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. | रु.८,६८,७२,२५५/-<br>(वार्षिक आवर्ती खर्च) |
| २ | सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत स्टेट डाटा सेंटर (बीएसएनएल आयडीसी मुंबई) व डिझास्टर रिकव्हरी सेंटर (एनआयसी,नवी दिल्ली)या ठिकाणी Multiprotocol Label Switching (MPLS) नेटवर्क कनक्टीव्हीटीचे ३४ Mbps ते १ Gbps कनेक्टीव्हीटी मध्ये सन २०१६-२०१७ या वर्षा पासुन पुढील काळासाठी अपग्रेडेशन करणे. | मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दि.१७.१.२०१७ रोजीच्या राज्य ॲपेक्स समितीच्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. | रु.१,५७,८१,२१०/-<br>(वार्षीक आवर्ती खर्च)<br>सन २०१६-२०१७ पासुन पूढे दरवर्षी. |
| ३ | विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष यांच्या कार्यालयात सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत दोन नोडची जोडणी करण्याबाबत. | मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दि.१७.१.२०१७ रोजीच्या राज्य ॲपेक्स समितीच्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. | रु.६,६६,०३७/-<br>(अनावर्ती खर्च) |
| ४. | सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत Pentaho Business Intelligence/ Crime Analytics Tool हे सॉफ्टवेअर जोडणी करण्याबाबत. | मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दि.१७.१.२०१७ रोजीच्या राज्य ॲपेक्स समितीच्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. | रु. ३५ लाख<br>(अनावर्ती खर्च) |

२. उपरोक्त तक्त्यातील अनु.क्र. २ मध्ये नमुद MPLS नेटवर्क कनेक्टिव्हीटीचे ३४ Mbps ते १ Gbps नेटवर्क कनेक्टिव्हीटी मध्ये अपग्रेडेशन करण्यासाठी सन-२०१६-२०१७ या एक वर्षाच्या कालावधीसाठी येणारा खर्च तात्काळ करावयाचा असल्याने सदर खर्च " मागणी क्र.१, २०५५- पोलीस (००) ११५, पोलीस दलाचे आधुनिकीकरण (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प (२०५५ ए ०३२), ५०- इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-२०१७ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त तक्त्यातील अनु. क्र. १ व २ मधील कामासाठी येणा-या खर्चामध्ये दरवर्षी सेवाकराच्या प्रचलीत दराप्रमाणे सेवाकराची रक्कम समाविष्ट राहील.

४. उपरोक्त तक्त्यात नमुद अनु.क्र. ३ व ४ मधील कामाबाबत/बाबींकरिता येणारा खर्च "मागणी क्र.१, २०५५- पोलीस (००) ११५, पोलीस दलाचे आधुनिकीकरण (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प (२०५५ ए ०३२) योजनांतर्गत, ५०- इतर खर्च," या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२७१५०४१५१६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kailas A.
Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2017.03.27 15:08:45 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**उप सचिव, गृह विभाग,**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव
५. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई.

९. अपर पोलीस महासंचालक (नि व सं) , महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१०.अपर पोलीस महासंचालक ,राज्य गुन्हे अभिलेख कक्ष, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य,पुणे.

११.सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ,मुंबई.

१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१३.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

१४.प्रकल्प संचालक, मे.विप्रो प्रा.लि.,मुंबई

१५. वित्त विभाग, व्यय-७/ वित्तीय सुधारणा.

१६.अवर सचिव, अर्थ-१ ,गृह विभाग.

१७.निवडनस्ती, पोल-३.

****